( कानिटकर ). **श्लोक ५. काश्मीरसंसेचित**; केशराचा सडा घातलेली. **सदंभा**; गर्विष्ठ, मानी.

**पृष्ठ ६६. श्लोक ८.** उदंत; ( सं. पुल्लिंगी ) वार्ता. **जरासंध**; बृहद्रथाचा मुलगा व कंसाचा सासरा. याच्या शरीराचीं उपजतांच दोन छकलें होतीं. तीं 'जरा' नांवाच्या राक्षसीनें सांधलीं, व त्यामुळें त्याला जरासंध हें नांव प्राप्त झालें. **श्लोक १३. अतिमृदुतरबाला**; अतिशय मऊ केंसांच्या किंवा लोंकरीच्या.

**पृष्ठ ६७. श्लोक १७. चरण २–चौक**; लग्नकार्यांत तांदुळ, गहुं वगैरेचा पाटावर घालतात तो. **श्लोक १९. संप्रोछन**; (अं + प्र + उच्छ् = पुसणें; प्राकृत-प्रोच्छन ) अंग पुसणें. **श्लोक २०. बाळातपीं**; कोवळ्या उन्हांत. **आलीजनें**; सखीजनानें. **श्लोक २४. चरण १**–कानांतील बाळ्यांचे प्रकार.

**पृष्ठ ६८. श्लोक २७. दशावतारांकित**; परमेश्वराच्या दहा अवतारांचीं चित्रें काढलेल्या. **श्लोक २९. अपेटी, अमाळा.** पेट्या व माळा हे अलंकार निस्तेज झाले. ( पंगु ). **श्लोक ३०. सज**; सज्ज, सुशोभित. **श्लोक ३१. अनवट**; नवीन; मागील श्लोकांतील 'अपेटी,' 'अमाळा' याही शब्दांत 'अ'चा अर्थ अभावात्मक नसून दुसरा कांहींतरी असावा. **निटल्या**; नीट रीतीनें नकसून केलेल्या. **श्लोक ३२. कावरोधे**; कां अवरोधे. ( अवरोधे–अडथळा करतो, आड येतो. ) **श्लोक ३४. सुपानी**; पाणीदार, तेजस्वी. **श्लोक ३६. पुण्याहवाचन**; विवाहादि मंगलकार्यांतील प्रारंभींचें धर्मकृत्य. **नीरांजन करणें**; औक्षण करणें, ओवाळणें.

**पृष्ठ ६९. श्लोक ३७. पद्मापदोपासक**; लक्ष्मीच्या चरणाचे भक्त. **श्लोक ४३. वस्तुविवेक**; तत्त्वाचा, सत्यब्रह्माचा विचार. **श्लोक ४५. अजपा**; 'हंस' नांवाचा मंत्र; यांत प्राणायामाचा संबंध येतो. **श्लोक ४६. पांच्या**; ( सं. पंचिका=ऐतरेय ब्राह्मणग्रंथांतील प्रत्येक पुस्तकाचें नांव. ) ऐतरेय ब्राह्मणग्रंथ. **श्लोक ४७. श्रीश-मुद्रा**; विष्णुमुद्रा, वैष्णवांच्या मुद्रा. **निद्रा**; 'निद्रा'ऐवजीं 'रुद्रा' असा चांगला पाठ प्रो. पंगु सुचवितात.

**पृष्ठ ७०. श्लोक ५०. गोडखे**; गोडखाऊ. ( कानिटकर ). **पृष्ठ ७१. श्लोक ६२. कपालें; चरण १**–कपालें ( मनुष्याच्या कवट्या धारण करणारे कापालिक. ) **निग्रहस्थान**; पराजय. **श्लोक ६३. चरण २**–या श्लोकांत मीमांसक नैय्यायिकांना दोष देतात. नैय्यायिक पटाचें उपादान कारण सांगतांना 'वेमा' ( मागाची फणी )

व 'तुरी' ( धोटा ), व घटाचें उपादानकारण सांगतांना 'चक्र' ( कुंभाराचें चाक ) हीं उदाहरणें देतात. 'तुमची बडबड केवळ बौद्धिक आहे, परमार्थदायक नाहीं' असा भाव. ( पंगु ).

**पृष्ठ ७२. श्लोक ७५. पत्रशाका**; पालेभाज्या. **श्लोक ७९. बिरिंज्या**; ( बिरंज = केशरी भात. ) गुजराथी शब्द.

**पृष्ठ ७३. श्लोक ८२. कर्कर**; (?) **श्लोक ८६. करजल पुतळी**; करपुतळी. दिवा व काजळ लावलेलें भांडें घेऊन शकुन पहाण्याची तऱ्हा. **श्लोक ८७. पदरेंसीं**; एकव्या पदरानें; दुसरें कांहीं पांघरावयास न घेतां.

**पृष्ठ ७४. श्लोक ९५. सभाक्षोभ**; सभा पाहून गांगरून जाणें.

**पृष्ठ ७५. श्लोक १००. कृष्णार्थ**; द्रौपदीकरितां. **श्लोक १०१. पांखरू**; गरुड, विष्णूचें वाहन. **श्लोक १०४, १०५.** रुक्मीला उद्देशून बोलते. **श्लोक १०८. क्षितिधरकुलोत्तंसकुलजा**; गिरिकुलांत श्रेष्ठ अशा कुलांत जन्म पावलेली हिमनगतनया पार्वती. **शिवसुरत**; शंकराच्या ठिकाणीं रममाण होणारी. **शरीरार्धपतिका**; शरीरार्धाची स्वामिनी.

**पृष्ठ ७६. श्लोक १०९. कारुण्य लहरी**; 'कारुण्यलहरी' असा एक समास घ्यावा. **श्लोक ११०. विश्वप्रणितचरित**; ज्याचें चरित्र अखिल जगताच्यापुढें आहे, असा. या श्लोकाचे पहिले दोन चरण निर्यमक आहेत. **पावेसि**; पावशील. **श्लोक १११. न मनिं**; मानूं नको. **श्लोक ११२.** पहिल्या दोन चरणांत 'सम' अलंकार आहे. दोन पदार्थांचा यथायोग्य योग वर्णिला असतां 'सम' अलंकार होतो. हा योग दोन चांगल्या किंवा वाईट वस्तूंमध्यें असतो. **श्लोक ११५. कुसुमशरनालीकनलिका**; मदनाचे बाण ठेवण्याची नळी.

**पृष्ठ ७७. श्लोक ११६.** मदन किंवा प्रद्युम्न हा रुक्मिणी व कृष्ण यांचा मुलगा असल्यामुळें, रुक्मिणीनें लग्नाच्या आधीं आपण त्याची माता असा उल्लेख केल्यानें या ठिकाणीं कालविपर्यास झाला आहे. **श्लोक ११९. वितर्कावर्तीं**; वितर्कांच्या भोवऱ्यांत. **श्लोक १२०. विधुर**; विरहव्यथित. **श्लोक १२२. प्रकृतिकमनीया**; स्वभावता सुंदर असलेली.

**पृष्ठ ७८. श्लोक १२३. रागेजसिल**; रागावशील. **श्लोक १२४. वळसा**; घोटाळा. **श्लोक १२६. अवश्यंभावी**; अवश्य घडून येणारें. **श्लोक १२७**

**विधुर**; विरहावस्था अनुभविणारी. **श्लोक १२८. दगदली**; ( दगदगणें=त्रासणें ) त्रासली, श्रमली.

**पृष्ठ ७९. श्लोक १३४. चरण १**–( १ ) सूर्याशिवाय मनुष्यांस रात्र कंठावी लागते तशी तुझ्याशिवाय माझी स्थिति झाली आहे. तुझ्याशिवाय मला सुखाचा प्रकाश मिळत नाहीं. **अवस**; अमावास्या. ( २ ) **अवस** = उत्कृष्ट हौस, आवड, (फारशी 'हवस'=अवस). (कानिटकर). पहिलाच अर्थ बरा वाटतो. **श्लोक १३८. चरण ४**–कृष्णाशिवाय तिच्या जिवाची उलघाल होत होती. **श्लोक १३९. प्रमदविपिनगर्भीं**; क्रीडोद्यानाच्या मध्यभागीं.

**पृष्ठ ८०. श्लोक १४२. ध्रुव व गजेंद्र**; (सर्ग १–श्लोक ९ टीप पहा). **अंबरीष**; हा एक विष्णुभक्त राजा होता. त्याचें सत्त्व पहाण्याकरितां एका द्वादशीचे दिवशीं पहांटेच दुर्वास ऋषि त्याचेकडे गेले व 'स्नान करून भोजनास येतों' असें सांगून नदीतीरावर गेले व सूर्योदयापर्यंत परत आले नाहींत. इकडे सूर्योदयाला एकादशीचें पारणें फेडावयाचें असल्यामुळें राजाला मोठी अडचण पडली. अतिथीला टाकून आपण भोजन करणें योग्य नसल्यामुळें त्यानें एक तुलशीपत्र तोंडांत टाकून पारणें फेडलें, पण दुर्वास परत आल्यावर त्याला तेंही खपलें नाहीं, व त्यानें राजाचा फार छळ केला. शेवटी, परमेश्वरानें आपलें सुदर्शन चक्र ऋषीच्या पाठीस लावून त्याला अंबरीषापुढें शरण जावयास भाग पाडलें. **श्लोक १४५. आठव्या**; कृष्णावतार आठवा होता.

**पृष्ठ ८१. चरण ४–श्लोक १४९. भेद दिधला**; घरांतील भीमक व रुक्मी यांच्या मधील मतभेद कळविला. **अपराधीण**; ( उपरोधिक. ) **श्लोक १५२. पृथा**: पांडवांची आई, कुंती. धर्माच्या राजसूययज्ञांत श्रीकृष्णानें उष्टीं काढिलीं त्याला उद्देशून ही ओळ आहे.

**पृष्ठ ८२. श्लोक १५७. व्रजयुवति दाटींतहि**; 'व्रजयुवतिदाटींतहि' असा एक समास घ्यावा. गोकुळांतील गोपींच्या दाटींत. **श्लोक १६२. मुरकुंडी पडणें**; गर्दी होणें.

---

# सर्ग सातवा

**पृष्ठ ८३. श्लोक १. हृदयगत**; मनांतील विचार, मनोगत.

**पृष्ठ ८४. श्लोक ४. कृष्णागमनभव**; श्रीकृष्णाच्या आगमनानें उत्पन्न झालेला. **श्लोक ५. सरोव्याजें**; सरांच्या मिषानें. **द्वंद्वींहुन**; दोन नेत्रांतून. अतिशयोक्ति अलंकार. **श्लोक ६. शुभाशंसी**; शुभ दर्शविणारी. **नेत्रशफरी**; माशाप्रमाणें दिसणारे नेत्र. **श्लोक १०. संजीवनसिद्धि**; पुनर्जन्माची प्राप्ति.

**पृष्ठ ८५. श्लोक ११. निदाघकाळ**; ( निदाघ, उष्णता ), उन्हाळा. **श्लोक १२. चरण ४.** मनांतील विचार जागच्या जागीं जिरून गेले. **श्लोक १८. सांख्य**; सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, मीमांसा आणि वेदांत या सहा दर्शनांपैकीं एक. **पातंजल**; योगशास्त्र. **वेदशिरोरहस्यें**; वेदांतील मुख्य मुख्य गूढ तत्त्वें. **तत्प्राप्ति**; परमेश्वरप्राप्ति. **सामरस्यें**; तन्मय झाल्यानें. **श्लोक २०. चरण ३** व **४—वागेति**; वागतात. **अति संचरूना**; ह्याचा अर्थ लागत नाहीं; शिवाय यमकाला जुळत नाहीं. तेव्हां कानिटकर म्हणतात त्याप्रमाणें 'अति संच' किंवा 'अतिसच्च' ( फार चांगल्या ) असा पाठ घ्यावा. **पंचसूना** ( चरण ४ ). गृहस्थाश्रमांत घडणाऱ्याच हत्या. त्यांचें परिमार्जन करण्याकरितां वैश्वदेव समयीं 'पंचसूना दोषपरिहारार्थम्' असा संकल्प करावा लागतो. 'पंचसूना गृहस्थस्य चुल्ली पेषण्युपस्करः। कुंडनी चाद कुंभश्च'—मनुस्मृति. ( कानिटकर ). **श्लोक २१. गोमती**; ( **चरण १** ) नदीचें नांव; ( **चरण २** ) इंद्रियें व बुद्धि यांचा. **हीरांकुरांच्या**; हिरकण्यांचा. **श्लोक २४. छत्तीस गुण**; वधुवरांच्या पत्रिकांत दिसून येणारे गुण. हे गुण एकंदर छत्तीस असतात. त्यांत कांहीं अनुकूल, कांहीं प्रतिकूल असे असतात. कृष्णाच्या व रुक्मिणीच्या पत्रिकेंत सर्वच गुण अनुकूल आहेत हा भाव.

**पृष्ठ ८६. श्लोक २७. तदर्थ**; कृष्णप्राप्त्यर्थ. **श्लोक ३०. चरण ४**—जमिनींत टाकलेलें बी उगवून त्याला अंकूर आलें म्हणजे त्याला फळें येण्याची आशा असते, त्याप्रमाणें माझ्या मनोरथांना आतां अंकुर फुटल्यामुळें ते फलप्रद होण्याच्या मार्गाला लागले आहेत. **श्लोक ३२–३९.** या श्लोकांत वर्णिलेल्या सुदेवाची स्थिति पाहून द्वारकेला श्रीकृष्णाला भेटून परत आलेल्या सुदामदेवाची आठवण होते.

**पृष्ठ ८७. श्लोक ३५. सुवर्णपीठ**; सुवर्णासन. **श्लोक ३६. वसनांचळानें**; वस्त्राच्या, लुगड्याच्या पदरानें. **श्लोक ३९. अरणीयुग्म**; अग्नि उत्पन्न करण्याची दोन काष्ठें. **दषदुपल**; वरवंटा. **श्लोक ४०. धसासे पडति**; छाती धडधडूं लागली.

**पृष्ठ ८८. श्लोक ५२.** चौरडोली=अंबारी. **रुमाल वारणें**; शेल्यासारखें वस्त्र ( रुमाल वगैरे ) चंवरीसारखें राजेरजवाड्यांवर वारणें. **श्लोक ५३. वाम**; दुःख करी, दुःखी होई. **श्लोक ५५. सतखे करीती**; भात, नारळ, वगैरे जिन्नस ओवाळून टाकतात. **श्लोक ५६. राजवीथी**; राजमार्ग.

**पृष्ठ ८९. श्लोक ५८. तारा**; डोळ्यांतील बाहुली; दृष्टि. **चरण ४**–स्त्रियांची नजर किंवा दृष्टि घरांत ठरेना. **श्लोक ६३. भूषा विपर्यास**; एक समास पाहिजे; दागिन्यांची अदलाबदल; भलता दागिना भलत्या जागीं घालणें. **पादांगद**; ( पाद+ अंगद ) पायांतील भूषण. वास्तविक 'अंगद' शब्द मनगटांतील भूषणाला लावतात. **श्लोक ६५. कृतविपरीतदशा**; ज्यांची मनाची स्थिति चमत्कारिक केली आहे, बदलून टाकली आहे, अशा. **निरंजनानें**; श्रीकृष्णानें. **श्लोक ६९. स्मरवैजयंती**; मदनाच्या ध्वजा.

**पृष्ठ ९०. श्लोक ७१. बलाया घेणें**; इडापिडा बाहेर घालविण्यासाठीं बोटें मोडून दृष्ट काढणें. **श्लोक ८०. असूर्यंपश्या**; सूर्याचें दर्शनही ज्यांना घडणार नाहीं अश्या. **स्खळण पावेति**; पडतात. **चवधी**; चतुर्विध मुक्ति.

**पृष्ठ ९१. श्लोक ८३. मुकुलितमुखी**; जिचें तोंड मिटलें होतें, जिच्या मुखां- तून एकही शब्द निघत नव्हता अशी. **श्लोक ८४. प्रत्युद्गमनविधि**; सामोरें जाऊन भेटण्याचा आचार. **श्लोक ८७. नृपमूर्धन्य कुमरी**; राजाधिराजाची कन्या **चरण ३ व ४**–श्रीकृष्ण परमात्म्याच्या परमेश्वरी स्वरूपाची, सर्वत्र अणुरेणूसुद्धां व्यापून उरणाऱ्या स्वरूपाची, ओळख झाल्यामुळें, जिला 'कृष्ण आला, कृष्ण गेला' वगैरे सांगण्यांत कांहीं अर्थ नव्हता.

**पृष्ठ ९२. श्लोक ९३. चरण ४**–अनिष्टद्योतक शिंक येऊन अपशकुन झाला. **श्लोक ९९. ग्रंथ उकले**; या गोष्टीचा धागा लागला; कोडें उलगडलें.

**पृष्ठ ९३. श्लोक १०१. सरपाड**; सारखी योग्यता, समानगुणता. **श्लोक १०२. अंप्रिळ**; 'अंप्रिल' असा संस्कृत शब्द नाहीं प्रो. पंगूंचा 'अप्रिय' हा पाठ योग्य अर्थाभावीं पटत नाहीं. त्यांतल्या त्यांत श्री. कानिटकरांनीं सुचविलेला 'कंप्रि-

लद्दक्प्रसंगें ' हा पाठ बरा दिसतो. ' कंप्र = चंचल. ' ' कंप्रिलद्दक् ' = चंचलद्दक्. **श्लोक १०३. दुःखास्पद**; दुःखाचें स्थान, दुःखदायक. **श्लोक १०४.** या व पुढील श्लोकांत रुक्मिणीच्या आईनें तिला सासरीं कसें वागावें याविषयीं फार उत्तम उपदेश केला आहे. **श्लोक १०४. तंती लागसी**; ओळीला, मार्गाला लागलीस. **श्लोक १०५. चरण २**–मला तुझ्याविषयीं फार काळजी वाटते. **श्लोक १०६. पोटागीची माय**; जिच्या पोटांत मुलीविषयीं कालवाकालव होते अशी; आंतड्याला पीळ पडणारी. **श्लोक १०८. भावा**; दीर. **श्लोक १०९. तिरांचे माणुस**; तिरसट, रागीट माणूस.

**पृष्ठ ९४. श्लोक ११७. चरण ३** व ४–जर तुझ्या मुखांतून अभिमानाचे उद्दाम शब्द आले तर तुझ्या सद्गुणांचें मूळच नाहींसें झालें असें समज. **श्लोक ११९. सांडी धरणें**; हार खाणें. **श्लोक १२०. अनासक्तपणा**; निरिच्छता. **श्लोक १२२. खांडव**; खांडववन. ह्या इंद्राच्या अरण्याचा अग्नीनें कृष्ण व अर्जुन यांच्या साहाय्यानें फडशा पाडला. **कृष्णा**; द्रौपदी. **श्लोक १२३.** बुद्बुदरूप; बुडबुड्यासारखा. बुद्बुद; बुडबुडा. **श्लोक १२७. चरण २**–पापाला पाठमोरी हो; पापाचरणापासून लांब रहा.

**पृष्ठ ९५. श्लोक १३५.** अर्थ :––तुझा केशकलाप तमोमय प्रदेशाप्रमाणें दिसून त्यांतून मुखरूपी चंद्र रात्रंदिवस प्रकाशतो आहे, असा भास झाल्यामुळें काचोळीच्या आंत दडून बसलेलें स्तनरूपी चक्रवाक पक्ष्यांचें जोडपें या रात्रीमुळें होणाऱ्या वियोगाच्या कल्पनेनें भिऊन गेलें आहे. **श्लोक १३७. चरण ३**–हलक्या कानानें जर कोणाच्या चहाड्या ऐकणार नाहींस. **श्लोक १४१. चरण ३**–जोंपर्यंत जिवंत आहों ( ज्यावें ) तोंपर्यंत दानधर्म करण्याकरितां हात नेहमीं वर केलेला असावा.

**पृष्ठ ९६. श्लोक १४२. वेचेंकरून**; खर्च करून. **श्लोक १४५. चरण १**–तूं या संसारसुखांत आसक्ति न धरतां त्याच्याकडे दुर्लक्ष करून ( उपेक्षा बुद्धीनें ) रहा ( विचर ). **परुषवचनोच्चारण**; कठोर शब्दांचा उच्चार.

**पृष्ठ ९७. श्लोक १४९.** हा श्लोक वामन पंडितांच्या स्फुट श्लोकांत आढळतो. **श्लोक १५४. प्रणविनितदुच्छिष्ट**; ' प्रणविनि '=श्रुति. त्यांचा महिमा; त्याच्यापासून निघालेला ( तदुच्छिष्ट ). कारण, " यस्य निश्वसितं वेदाः " । श्रीकृष्णमहिमा अचिंत्य असून वेद हे त्याचें उच्छिष्ट होत. ( कानिटकर. ) **श्लोक १५५. चरण ४**–

पतिवंचना करणाऱ्या स्त्रियांची गति वडाच्या शाखाग्रांवर पहावयास सांपडते. त्यांना वटवाघुळाचा जन्म येतो.

**पृष्ठ ९८. श्लोक १६०. शिक्षाविधि**; शिकवण, उपदेश. **श्लोक १६७. निर्वाहकर्ता**; संकटांतून पार पाडणारा.

**पृष्ठ ९९. श्लोक १७०. ऐहिकामुष्मिक**; इहपरलोकचें सुख. **श्लोक १७२. उगऊन द्यावें**; स्पष्ट करून सांगावें.

---

## सर्ग आठवा

**पृष्ठ. १००. श्लोक ४. हिलाटें**; हिलाल. **हिलाटें घेति**; टेंभा मिरवितात. **श्लोक ६. कूडमंत्री**; कपटाचा सल्ला देणारा; दगलबाज. ( सं. कूट; म. कुडें. )

**पृष्ठ १०१. श्लोक १३. राहो**; ( **चरण २** ); राहु. दाड; द्वाड. **श्लोक १७. कुसृष्टि**; वाईट कल्पना; भलते विचार. **श्लोक २१. विंधिला**; टोंचला.

**पृष्ठ १०२. श्लोक २८. कपाट देणें**; दार लावणें. **श्लोक ३५. ताळ पडणें**; ताळ सुटणें, बेबनाव होणें, खटका उडणें. **श्लोक ३७. चरण** १–हें ऐकून आईला आनंद झाला नाहीं, तर आईपणा कोठें राहिला; ती आई कसली ? **बीजाक्षरमंत्र**; गूढ गोष्टीची सूचना. **श्लोक ३८. शकुनग्रंथी**; शुभ शकुनाची गांठ.

**पृष्ठ १०३. श्लोक ४०. संवरणार्थ**; लग्नाच्या वेळीं माळ घालण्याकरितां. **आगुल्फ**; पायांच्या घोट्यांपर्यंत. **श्लोक ४१. विश्वेश्वरी**; विश्वस्वामिनी रुक्मिणी. **श्लोक ४२. मुक्ताफळस्तोम**; मोत्यांचे घोंस. **श्लोक ४४. कारी**; क्वारी, मुलगी. **श्लोक ४५.** झोंपाळ्याप्रमाणें अस्थिर वृत्ति. **दोला**; झोपाळा, झुला. **श्लोक ४८. अवेक्षिता**; पाहणारा, दृष्टि टाकणारा. **नाकीं चुना लावणें**; फसविणें, हातावर तुरी देणें. **चरण ४**–वाईट दुष्ट विचार ज्याचे त्यालाच फळतात; त्यांचीं फळें त्यांच्या पुढेंच दत्त म्हणून उभीं राहतात. **श्लोक ५०. वारमुख्या**; मुख्य मुख्य वारांगना. **श्लोक ५२. पदातिफेरा**; पायदळाचा घेर. **श्लोक ५३. वन्हियंत्रें**; तोफा. **श्लोक ५३. कट**; सैन्याची तुकडी. ५१–५२ श्लोकांत सांगितलेल्या 'शिपाई,' 'पदातिफेरा,' 'स्वारसमूह,' 'रथ', 'गज,' 'वन्हियंत्रें,' ह्या सैन्याच्या सहा विभागांची ( कट ) व्यवस्थित रचना केली होती.

**पृष्ठ १०४. श्लोक ५५. गूढलीला**; जिची कृति गुप्त प्रकारची होती अशी. **श्लोक ५९. अगस्तिपत्नी**; लोपामुद्रा. **अत्रिपत्नी**; अनसूया. **मुद्गल**; एक ऋषि. **अरुंधती**; वसिष्ठ ऋषीची पत्नी. **अतिप्रबुद्धा**; अतिशय शहाण्या. **श्लोक ६६. पुन्नाम**; पुरुषाचें नांव.

**पृष्ठ १०५. श्लोक ६९. मलापकर्षस्नपनीय**; मळ धुऊन काढण्याकरितां. **श्लोक ७१. प्रवाळपीठावर**; पोंवळ्यांच्या आसनावर. **चरण ३**-केशर (काश्मीर) व कस्तुरी समभाग घेऊन. **श्लोक ७६. यथास्थानदेशीं**; अवयवांच्या योग्य ठिकाणीं.

**पृष्ठ १०६. श्लोक ७९. एकार्तिक**; आरतीचें एका वातीचें नीरांजन. **श्लोक ८३. सुवर्णपर्याणित**; सुवर्णाचें सामान (खोगीर वगैरे) घातलेले. (सं. पर्याण; पल्याण, खोगीर.) **श्लोक ८४. मृदूपधानान्वित**; मऊ उशांसहित. **श्लोक ८७. लोपामुद्रा**; अगस्त्य ऋषीची पत्नी. **अनसूया**; अत्री ऋषीची पत्नी. **मुद्गल**; ऋषि-विशेष. **श्लोक ८८. त्रिनयनगृहस्वामिनि**; हे त्रिनयनाची म्हणजे शंकराची गृहिणी, पार्वती. **मृदुस्वांते**; हे कोमलहृदये. **जुगवती**; (सं. युग्) घडवून आण-णारी. **श्लोक ८९. आनर्ताधिप**; आनर्त देशाचा (काठेवाड, यालाच 'सौराष्ट्र' असें पूर्वी नांव असे) अधिपति; कृष्ण.

**पृष्ठ १०७. श्लोक ९०. स्मितज्योत्स्नाजाळें**; सर्वत्र पसरलेल्या हास्यरूपी चांदण्यानें. **निजनिलय**; तिचें स्थान, देऊळ. **श्लोक ९२. पुरोभागीं**; देवळाच्या पुढें. **अतितत**; (सं. तन्.) अतिशय विस्तृत. **नानाविध निवह**; नाना प्रकारचे समुदाय. **घनवटें**; दाटी करी. समुदायांनीं दाटी झाली होती. **श्लोक ९४. उद्वर्तिति**; तोंडाला हळद लावतात. **रावत्रीलीं**; (अळित्यानें) रंगविलीं. **श्लोक ९५. कंठसूत्र**; मंगळसूत्र; गळेसरी. **श्लोक ९८. सोदरमुख्यजाया**; भावाची पट्ट-राणी. **दुलावी**; लबाड. **श्लोक ९९. मेनका**; एक अप्सरा. **सुरवारमुख्या**; मुख्य मुख्य अप्सरा. **श्लोक १००. मल्ली कुसुमें**; मालतीचीं फुलें. **तत्केशसंस्कार**; तिची वेणीफणी. **सुकेशी व मंजुघोषा**; अप्सरांचीं नांवें. **विभूषा**; दागिने.

**पृष्ठ १०८. श्लोक १०१. तिलोत्तमा व रंभा**; अप्सरांचीं नांवें. **उठी**; उत्था-पन. **श्लोक १०२. उर्वशी व घृताची**; अप्सरांचीं नांवें. **वसीला**; वशिला, ओळख. **श्लोक १०३. संदेहसोपान**; संशयांचा सोपान (जिना; पायऱ्या). **श्लोक १०४.**

**पहाणी**; दृष्टि, पहाण्याची लकब. **श्लोक १०५. भरोन धापें**; धाप किंवा दम लागल्यामुळें. **श्लोक १०८. आलीकडे**; तुझ्यापासून लांब. **आत्मीय**; खरोखर तुझा असा म्हणविणारा. **श्लोक १०९. निसांसी**; निश्वांसी. **चरण ३**–हें तुझें आचरण कोणत्या प्रकारचें आहे ? तूं असें कसें आचरण करतेस ? **कोण**; कोणत्या प्रकारचें. **चरण ४**–परब्रह्म श्रीकृष्ण तुझी वाट पहात आहे. **श्लोक ११०. विवेकांजन**; विचाररूपी काजळ. **उदासपणें**; निरासक्तवृत्तीनें. **अद्वैत**; श्रीकृष्ण परमात्मा. **श्लोक ११३. क्षत्रियाधम**; शिशुपाल. **हताश**; निराश. **श्लोक ११४. चरण ३**–चिलखतें, शस्त्रें, सैन्य व रथ यांनीं युक्त, सज्ज होऊन. **संनद्ध**; चिलखत घातलेला. **वाहन**; रथ.

**पृष्ठ १०९. श्लोक ११५. विविधभार**; नाना प्रकारचीं सैन्यें. **श्लोक ११७. व्युत्पत्तीला**; मूळ स्थानाला, उत्पत्तिस्थानाला. रुक्मिणी ही आदिमाया प्रकृति असून, परमेश्वरापासून प्रकृति उत्पन्न झाल्यामुळें, श्रीकृष्ण परमात्मा हा तिचें मूलस्थान होय. श्रीकृष्णाला जाऊन मिळशील हा भाव. **श्लोक ११८. वीरगुंठी**; वीराला शोभण्यासारखी गांठ. **चरण ३–वदननिहितवंशीं**; मुरलीला तोंड लावलेला, मुखाशीं मुरली धरणारा. **श्लोक ११९. कौस्तुभ**; श्रीकृष्णाचा मणी. **वैजयंती**; कृष्णाची माला. **श्लोक १२०. खगपति**; गरुड. **श्लोक १२१. न लक्षे**; दिसत नाहीं. **सत्ता**; शक्ति. **श्लोक १२२. स्वस्त्यस्तुते**; तुझें कल्याण असो.

**पृष्ठ ११०. श्लोक १२३. मुळ**; मूळ, बोलवणें. **श्लोक १२६. पृथिवी-पुरुहूतपुत्री**; पृथिवीपतीची, राजाची कन्या. **विकचपद्मपलाशनेत्री**; प्रफुल्ल कमल-दलाप्रमाणें जिचे नेत्र आहेत अशी. **चारुशीला**; सुशील.

**पृष्ठ १११. श्लोक १३०. सौंदर्यसाररसनिर्मित**; उत्कृष्ट सौंदर्याच्या रसाची तयार केलेली. **श्लोक १३१. चरण १**–मुखचंद्र हा अमृताचा ( पक्षीं, अधरसुधा ) सिंधु. **उधार**; कर्ज. **चरण ४**–नाहीं तर हा चंद्र ( हरिणलाछन ) डाग असलेला असा कां ? **श्लोक १३२. अभुक्ता**; न वापरलेल्या कोऱ्या ( मुक्ता=मोतीं ). **सीमंतसीमपदवी**; केंसांतील भांगाचें स्थान. **येकावळीयुत**; एकावलीसहित. **श्लोक १३४. आकर्ण**; कानांपर्यंत. **षट्पदवृंद**; भृंगसमूह. **श्लोक १३६. व्यंजनस्तनी**; जिचे स्तन स्पष्ट दिसून येण्याइतके उन्नत होते अशी. **हेमशृंखळा**; सोन्याच्या सांखळ्या.

**पृष्ठ ११२. श्लोक १३७. मंडितेक्षणा**; विकसित झालेल्या कळी ( कुड्-

मल ) प्रमाणें शोभायमान दिसणारे नयन असलेली. **शुचिस्मिता**; शुभ्रहास्याची. ( हास्याचा रंग पांढरा असतो असा कविसंकेत आहे. ) **पक्व...धरा**; पिकलेल्या तोंडल्याचे भाऊच असे ओंठ असलेली. तिचे ओंठ तोंडल्यासारखे लाल होते हा भाव. **श्लोक १४०. भगवदाप्तिस**; परमेश्वरप्राप्तीला. **श्लोक १४१. चरण १ व २**–डाव्या करकमलानें केशपाश सांवरून, व कटाक्षांच्या बाणांनीं ( अपांग-विशिखीं ) इतर राजांना दूर करून. **श्लोक १४३. उमगीत**; ओळखीत. **मानसा**; मानससरोवराला. **परमहंसकुळावतंसी**; परमयोग्यांच्या कुलाला ललामभूत होणाऱ्या श्रीकृष्णाच्या ठायीं. या व पुढील दोन श्लोकांतील उत्प्रेक्षा अलंकार फार सुंदर आहेत.

**पृष्ठ ११३. श्लोक १४४. चातकप्रणयिनी**; चातकाची स्त्री. **निदाघतप्ता**; उन्हानें संतप्त झालेली. **श्लोक १४५. विषयांकुरमात्रचारा**; केवळ विषयरूपी कोंबांचा चारा ( कोंवळा व म्हणून त्याग करण्यास कठीण. ) **श्लोक १४६.** प्रयागतीर्थावरील गंगा, यमुना, सरस्वती या तीन नद्यांच्या संगमाला ‘त्रिवेणी संगम’ म्हणतात. या संगमावरील वटवृक्षावर पिंड दिला म्हणजे मोक्ष मिळतो अशी समजूत आहे. या श्लोकांत भीमकी व तिच्या सख्या यांचा त्रिवेणी संगम कल्पिला असून श्रीकृष्ण परमात्मा हा ( वट महीरुह ) वटवृक्ष कल्पिला आहे. हें फार सुंदर रूपक आहे.

**पृष्ठ ११४. श्लोक १५२. हिरांगदें**; हिरेजडित अंगदें; बाहुभूषणें. **श्लोक १५३. श्रीवत्सलक्ष्मीस**; श्रीवत्साच्या ऐश्वर्याला ( कृष्णाच्या वक्षस्थलावर विशेष शोभा येत होती. ) **त्रिदिवस्रवंती**; देवनदी जान्हवी ( गंगा ). **श्लोक १५५. आविर्भवे**; प्रकट होई. **चरण २**–किंवा शृंगाररसानें अवतार घेतला. **श्लोक १५६. अमुद्र**; स्पष्ट, स्फुट. **चरण ३, ४** रुक्मिणीची श्रीकृष्णाच्या पायांकडे खिळलेली दृष्टि जणुंकाय मेघाच्या पृथ्वीवरील सिंचनाप्रमाणें होती. ( प्रो. पंगु ). **श्लोक १५९.** यदूद्वह; यदुवंशोद्भव कृष्ण. **तिर्यङ्मुखी**; वाकड्या नजरेनें ( चोरून ) पहाणारी. **श्लोक १६०. सौजन्याचा निर्वाह**; सौजन्याची वर्तणूक.

**पृष्ठ ११५. श्लोक १६१. नवोढत्वें**; नवीन लग्न झाल्यामुळें. **श्लोक १६२. पृथुश्रोणिश्रांता**; स्थूल अशा जघनभागामुळें श्रांत झालेली. **स्विन्नवदना**; मुखावर घर्मबिंदू असलेली. **श्लोक १६४. सत्वाचें**; प्रेमाच्या सात्विक विकारांचें. **श्लोक**

१६५. जवदाणें (?). उतटती; तुटती. **श्लोक १६६. निवाडें;** निश्चयानें. **श्लोक १६७. प्रकृतिपुरुषां;** रुक्मिणी ही प्रकृति किंवा माया; व श्रीकृष्ण हा पुरुष किंवा परमात्मा. **प्रपचाविष्टांचा;** प्रपंचांत शिरलेल्या संसारी जनांचा. **हृदयग्रंथि;** मनाचा संशय.

**पृष्ठ ११६. श्लोक १६८; त्रिदशननगरी;** देवनगरी अमरावती. **विमोक्ता बंधाचा;** संसारबंधनांपासून मुक्त करणारा. **चरण ४.**–आधीं ज्याच्यावर फुलें घातलीं होतीं अशा माथ्यावर, मस्तकावर, ( देवांनीं ) कल्पवृक्षाच्या फुलांची वृष्टि केली. **श्लोक १६९. कुरवंडी करणें;** ओवाळून टाकणें. **श्लोक १७०. विनीतत्वें;** नम्रपणानें. **श्लोक १७१. हाहाहूहूप्रभृति;** 'हाहा' व 'हूहू' हे दोन गंधर्व होते. **स्वारस्यें;** सुरसपणामुळें. **अधरिती;** धिःकार करिती.

**पृष्ठ ११७. श्लोक १७७. पतितनिवहोद्धारक;** पतितजनांचा उद्धार करणारा. **निवह;** समुदाय. **श्लोक १७९. अनियत;** अनिश्चित. **सदसद्वस्तु;** सत्य व असत्य पदार्थ. **सुखसंदूक;** सुखाची पेटी.

---

परिशिष्ट

# संस्कृत काव्यांतील कांहीं थोडे
## समानार्थक उतारे



### सर्ग दुसरा

**श्लोक ३.** प्रजाः प्रजाः स्वा इव तन्त्रयित्वा । (शा. ५.)

**श्लोक ६.** एकमेव नौ जीवितं द्विधास्थितं पुनःशरीरम् । (शा. ६.)

**श्लोक २७.** १ तदीयमानीलमुखं स्तनद्वयम् । (रघु. ३–८.)
२ मुखेन समलक्ष्यत लोध्रपांडुना । (रघु. ३–२.)

**श्लोक ३०–३२.** न मे न्हिया शंसति किंचिदीप्सितं
स्पृहावती वस्तुषु केषु मागधी ।
इति स्म पृच्छत्यनुवेलमादतः
प्रिया सखीरुत्तरकोसलेश्वरः ॥ १ ॥ (रघु. ३–५.)

**श्लोक ३४.** नहीष्टमस्य त्रिदिवेऽपि भूपतेरभूदनासाद्यमधिज्य-
धन्वनः । (रघु. ३–६.)

**श्लोक ३८.** सर्वोपमद्रव्यसमुच्चयेन । यथा प्रदेशं विनिवेशितेन ॥
सा निर्मिता विश्वसृजा प्रयत्नात् । एकत्र सौंदर्य-
दिदृक्षयेव ॥ १ ॥ (कुमारसं)

### सर्ग तिसरा

**श्लोक ३७.** पटुपटहध्वनिभिर्विनीतनिद्रः । (रघु. ९)

**श्लोक १००.** हला पश्य नलिनीपत्रांतरितमपि सहचरमपश्यंती
आतुरा चक्रवाक्यारटति । (विक्रमो०)

**श्लोक १०९.** प्रजागरात् खिलीभूतस्तस्याः स्वप्ने समागमः ॥
बाष्पस्तु न ददात्येनां द्रष्टुं चित्रगतामपि ॥ १ ॥

**श्लोक १२३.** न पुनरेति गतं चतुरं वयः । ( रघु. ९. )

## सर्ग पांचवा

**श्लोक ८.** संक्रीडन्ते मणिभिरमरप्रार्थिता यत्र कन्याः ॥ ( मेघ. )

संस्कृत काव्याशीं परिचय असलेल्या वाचकांना आणखी असे अनेक उतारे सांपडतील. स्थलसंकोचास्तव त्या सर्वांचा या ठिकाणीं उल्लेख करतां येत नाहीं. केवळ उदाहरणें म्हणून कांहीं थोडीं स्थळें वर दाखविलीं आहेत.

---

# सामराजविरचित 'रुक्मिणीहरण.'

## कठिण शब्दांचे अर्थ.

### अ

**अकिंचन**–( सं ); गरीब, दरिद्री.
**अगरु**–( सं. ); चंदन.
**अग्रज**–( सं. ); ज्येष्ठ, वडील भाऊ.
**अग्रण्य**–( सं. अग्रणी ); पुढारी.
**अंग**–( सं. ); अवयव.
**अंगद**–( सं. ); बाहुभूषण.
**अंघ्रि**–( सं. ); पाय.
**अचर**–( सं. ); स्थावर; स्थीर, अढळ.
**अंचल**–( सं. ); पदर.
**अचाट**–( सं. अ + चाट ); चावट, फाजील; लबाड.
**अजान**–( सं. ज्ञा-जाणणें. ); अडाणी, अजाण.
**अजिर**–( सं. ); अंगण.
**अटाळा**–( सं. अट्टाल ); माळा.
**अतळस**–( अ. अतलस ); काळसर लाल सॅटिण.
**अतिशय**–( सं. ); अतिप्रसंग.
**अत्यय**–( सं. अति + इ ); शेवट, नाश.
**अत्याहित**–( सं. ); अत्याचार.
**अद्वैत**–( सं.); जीव व ब्रह्म यांचें ऐक्य.
**अधोक्षज**–( सं. ); विष्णु.
**अध्यपणें**–( सं. अध्यापन ); शिकविणें.
**अंधकारि**–( सं. ); अंधकासुराचा शत्रु; शंकर.
**अंधंतम**–( सं. ); तमोमय प्रदेश.
**अनभिमत**–( सं. ); अप्रिय; त्रासदायक.
**अनभिज्ञ**–( सं. ); अडाणी.
**अनर्घ्य**–( सं. ); मूल्यवान.
**अनर्ह**–( सं. ); अयोग्य, अनुचित कर्म.
**अनवरत**–( सं. ); सतत.
**अनात्मज्ञ**–( सं. ); अज्ञ, वेडा.
**अनाप्त**–( सं. ); परका, शत्रु.
**अनार्य**–( सं. ); उद्धट, असंभावित.
**अनिमिष**–( सं. ); डोळे न मिटतां; सावधानतेनें.
**अनियत**–( सं. ); भलता; अनियमित.
**अनिश**–( सं. ); एकसारखा; रात्रंदिवस.
**अनुपद**–( सं. ); पाठोपाठ; तत्काळ.
**अनुसंधान**–( सं. ); लक्ष; चित्त.
**अन्वय**–( सं. ); वंश.
**अपत्रप**–( सं. त्रपा; लाज );—निर्लज्ज.
**अपर्णा**–( सं. ); पार्वती.
**अपवर्ग**–( सं. ); मोक्ष.
**अपवाद**–( सं. ); निंदा.
**अपसद**–( सं. ); दुरात्मा, दुष्ट, नीच.
**अपूर्त**–( सं. ); अपूर्ण.

**अभिधा**–( सं. ); नांव.

**अभिलषित**–( सं. ); आवडती गोष्ट; इच्छा.

**अभिराम**–( सं. ); सुंदर.

**अभिज्ञ**–( सं. ); कुशल, शहाणा.

**अभिज्ञान**–( सं. ); खूण.

**अंभोधि**–( सं. ); समुद्र.

**अमासा**-लहान (सं. अम्-लहान); दुबळा.

**अमोघ**–( सं. ); न चुकणारा, पराक्रमी.

**अयोनिज**–( सं. ); विष्णु, ईश्वर.

**अरवार**–( का. अरलु = फूल ); हलका, ढिसूळ.

**अर्थी**–( सं. ); याचक.

**अलक**–( सं. ); केंस.

**अलगट**–( सं. अ + लग्न ); स्वतंत्र, फाजील.

**अलिंद**–( सं. ); ओटा.

**अवकाश**–( सं. ) पोकळी, रिकामी जागा.

**अवचट**–( सं. अवचित्त ); अकस्मात्, अवचित.

**अवज्ञा**–( सं. अवद्य. ); जड, हिडीस.

**अवतंस**–( सं. ); दागिना.

**अवद्य**–( सं. ); निंद्य, निंदास्पद भाषण.

**अवधारणें**–(सं. अवधृ); खात्री बाळगणें, लक्ष्यांत ठेवणें.

**अवरोध**–( सं. ) अंतःपूर.

**अविचारिका**–अविचारी स्त्री.

**अविच्छिन्न**–( सं. ); निवळ.

**अविदग्ध**–( सं. ); मूर्ख.

**अविषय**–( सं. ); अगोचर, अज्ञेय.

**अविहित**–( सं. अ+विधा ); संपूर्ण, अविभागलेलें; शास्त्रविरुद्ध.

**अवो**–( सं. अहो ); अहो.

**अव्यक्त**–( सं. ); निर्गुण, निराकार परमात्मा, ब्रह्म.

**अव्हाट**–( सं. अ+वाट ); आडमार्ग.

**असाली**–राक्षसीण, कृत्या.

**असोशी**–( सं. आ+शोष); उत्कट इच्छा.

**अस्तावा**–( फा. आफ्ताबा ); झारी.

**अहाळणें**–( का. होळकु; तेज ); पोळणें.

**अक्षवाण**–( सं. आयुष्यवान् ); ओवाळणें, औक्षण.

## आ

**आकरोट**–( सं. अक्षोट ); अक्रोड.

**आखंडळ**–( सं. आखंडल ); इंद्र.

**आगळा**–(सं. अग्र); मोठा, श्रेष्ठ, अधिक.

**आगळा**–( सं. आर्गला); अर्गळा, अडसर.

**आचमनीय**–( सं. ); चूळ भरून टाकण्याचें पाणी.

**आतपत्र**–( सं. ); छत्री.

**आतळणें**–(सं. आप्. आप्त. प्रा. आत्त) भेटणें, स्पर्श करणें.

**आतुडणें**–( सं. अत्रुट् ) भेटणें.

**आतंक**–( सं. ); भीति.

**आदर्श**–( सं. ); आरसा.

**आनाय**–( सं. ); जाळें.

**आंदोलणें**–( सं. आंदोल् ); हेलकावणें.

**आंदोलिका**–( सं. आंदोल् ); पालखी-सारखें एक वाहन.
**आपगा**–( सं. ); नदी.
**आपण**–( सं. ); बाजार.
**आपती**–( सं. आपत्ति ); संकट.
**आभा**–( सं. ); तेज, कांति.
**आयु**–( सं. ); आयुष्य.
**आरातिक**–( सं. आरति ); आरती.
**आराधक**–( सं. ); पूजा करणारा, भक्त.
**आलक-का**–( सं. 'आल'; कपट ) द्वाड, कपटी.
**आलोडणें**–( सं. आलुड् ); पारंगत होणें, हस्तगत करणें.
**आवर्त**–( सं. ); पाण्यांतील भोंवरा.
**आवळी**–( सं. आवली ); पंक्ती, ओळ.
**आश्रयाश**–( सं. ); अग्नि.
**आसक्ति**–( सं. ); अनुराग.

## इ

**इंगळ**–( सं. अंगार ); निखारा.
**इष्ट**–( सं. ); यज्ञयागादि कर्म.

## ई

**ईशान**–( सं. ); शंकर.

## उ

**उगड-डा**, **उगंड-डा** –( सं. उत् + घट् ); सुटका, उद्धार.
**उगवणें**–( सं. उद्गम् ); उलगडा करणें.
**उगला**;–व्यर्थ, मुकाट्यानें.

**उच्छून**–( सं. उत् + श्वी ); फुगलेला, उंचावलेला.
**उटणें**–( सं. उद्वर्त् ); स्वच्छ करणें, लेप देणें.
**उटाळणें**–( सं. उत् + ताल ); उत्पन्न होणें, उठणें, निघणें.
**उठणें**–( सं. उत् + स्था ); शोभून दिसणें, स्पष्ट दिसणें.
**उठाण**–( सं. उत् + स्था ); उन्नतता, उठावदारपणा.
**उडु**–( सं. ); नक्षत्र, तारा.
**उतटणें**–( सं. उत् + तन् ); फाटणें.
**उतती**–( का. ); खारीक.
**उत्पल**–( सं. ); कमल.
**उदन्त**–( सं. ); वार्ता.
**उदास**–( सं. ); तटस्थ, निरपेक्ष.
**उद्धत** ( सं. ); उद्धट.
**उद्योत**–( सं. ); प्रकाश.
**उद्वर्तणें**–( सं. उद्वर्त् ); उटणें वगैरे अंगाला लावणें.
**उद्वस**–( सं. ) उध्वस्त.
**उद्विग्न**–( सं. उद्विज् ); खिन्न.
**उधंटा**–( सं. उद्धत ); उद्धट आचरणाची.
**उधार**–( सं. उद् + आ + हृ ); कमीपणा.
**उपकंठ**–( सं. ); आसपासचा प्रदेश.
**उपचडा**–(म. उप + चढणें ); उमाळा, आवेग.
**उपधान**–( सं. ); उशी.
**उपन्यास**–( सं. ); विवरण.

**उपस्थान**–( सं. ); जवळ आणणें, पूजा, सेवा.

**उपायन**–( सं. ), नजर, भेट.

**उपेंद्र**–( सं. ); विष्णु.

**उबाळा**;–त्रास.

**उमासा**;–उसासा.

**उल्का**–( सं. ); आकाशांतून तुटलेला तारा.

**उसंत**–( सं. विश्रांति ); विश्रांति.

**ऊ**

**ऊर्मिका**–( सं. ); अंगठी.

**क**

**कदंब**–( सं. ); कळंबाचा वृक्ष समुदाय.

**कपाळी**–( सं. कपालि ); शंकर.

**कपोत**–( सं. ); कबूतर, पारवा.

**कबरी**–( सं. ); केशकलाप.

**करट**–( सं. ); गंडस्थल.

**करनाल**–( फा. कर्णा ); वाद्यविशेष.

**करपत्र**–( सं. ) करवत.

**करि**–( सं. कृ. ) करणी.

**करीणा**–( फा. ) हकीगत, इतिहास.

**कर्णपिशाचिका**–( सं. ); गुप्त सांगणारी.

**कलापी**–( सं. ); मोर.

**कषणें**–( सं. कष् ), घासणें.

**कारुक**–( सं. ); चितारी, कारागीर.

**कार्पण्य**–( सं. ); कंजुषपणा.

**काश्मीर**–( सं. ); केशर.

**किर्मीरित**–( सं. ); नानारंगाची, चित्रविचित्र.

**किल्ली**–( सं. कील ); किल्ली.

**किशोर**–( सं. ); लहान पोर.

**किसलय**–( सं. ); पालवी, कोमल पल्लव.

**कीर**–( सं. ); पोपट.

**कुचकुच**–( सं. कूज् ); कुजबूज.

**कुमार**–( सं. ); कार्तिकेय.

**कुड्मल**–( सं. ); कळी.

**कूर्पास**–( सं. ) चोळी, काचोळी.

**कूर्पासक**–( सं. ) चोळी.

**कोक**–( सं. ) चक्रवाक पक्षी.

**कोठी**–( सं. कोष्ठ ); कोठार, साहित्य ठेवण्याची खोली.

**कोरकें**–( का. कोरगु=शुष्क ); कोरान्न; कोरडें अन्न.

**कोरदार**–( का. कोरु ); कंगणीदार.

**कंज**–( सं. ); कमल

**कांची**–( सं. ); कंबरपट्टा.

**किंकिणी**–( सं. ); लहान घंटा.

**कोंचकी**–( कों. कोका ); पागोटें.

**कृपाणी**–( सं. ); खंजीर, खड्ग.

**कृशानु**–( सं. ); अग्नि.

**कृष्णसार**–( सं. ); हरीण.

**क्रम**–( सं. ); वेदपठणाचा एक प्रकार.

**क्वारी**–( सं. कुमारी. म. कुंवारी ); मुलगी.

**ख**

**खडाणी**–लाथ मारणारी गाय.

**खदिर**–( सं. ); कात, खदिरसार.

**खासा**–( फा. ); मुख्य सरदार.

**खिरणी**–एक लहान फळ.
**खिसमिस**–( फा. ); बेदाणा.
**खोती**–मक्का.
**खंज**–( सं. ); लंगडा.
**खंजन**–( सं. ). पक्षि विशेष.

### ग

**गणक**–( सं. ); ज्योतिषी; जोशी.
**गदाग्रज**–( सं. ); कृष्ण.
**गरळा**–( सं. गॄ. ); कडु कारळें किंवा दुसरें एकादें औषध चावून त्याचा तान्ह्या मुलास रस घालतात तो.
**गरिमा**–( सं. ); पुष्टपणा, मोठेपणा.
**गाढी**–( सं. ); मोठी.
**गार्हपत्य**–( सं. ); अग्नि.
**गुढी**–( का. ); पताका.
**गुह्यक**–( सं. ); यक्षकिन्नरांसारखे कुबेर–सेवक.
**गोडंबी**-(गोड बी) बिब्याच्या आंतील बी.
**गोपानशी**–सी ( सं. ); सज्जाच्या खांबा-खालीं येणारा तुळईचा भाग.
**गोमायु**–( सं. ); कोल्हा.
**गोमेद**–( सं. ); एक रत्न.
**गोसी**–( सं. गोष्ठी ); गोष्ट.
**गंगालय**–( सं. ); घंगाळ.
**गोंडाळ**–( देशी. गोंडी-मंजरी ); गोंडस.
**गृहपति**–( सं. ) अग्नि.

### घ

**घडीत**–( सं. घट ); घडण.
**घालफेडी**–गडबड, घालमेल.
**घालाघाली**–गोंधळ, धांदल.
**घुरट**–( सं. उग्र + ट ); घाणेरडी.
**घोंग**–( हिं. घूघी ); सोंग.

### च

**चतुरानन**–( सं. ) ब्रह्मदेव.
**चय**–( सं. ); समुदाय.
**चर**–( सं. ); जंगम.
**चलथ**–चवड, रास, चळथ.
**चार**–( सं. चर ); चपळ, लबाड.
**चार**–( सं. ) हेर.
**चिकसा**–उटणें, सुगंधी तृव्य.
**चित्तांक**–( सं. चित्र + अंक ) गळ्यांतील एक दागिना, चितांक.
**चिरीट**–चिरडखोर.
**चूचुक**–( सं. ); स्तनाचें अग्र.
**चूडा**–( सं. चूडा–कंकण ); बांगड्या.
**चेडें**–चेटुक.
**चैतन्य;**–( सं. ); परमात्मा, ब्रह्म.
**चोवा**–( हिं. ); चंदनाची उटी.
**चौकी**–( सं. चतुष्किका ); लहान चौरंग.
**चौढाळणें**–( सं. चतुर्धा ) गोलंकार करणें.
**चंडातक**–( सं. ); चोळी, काचोळी.
**चंद्रशाला**–( सं. ); गच्ची.

### छ

**छमीना**–( फा. ); शामियांना, डेरा.
**छांदस**–( सं. छंद ); छांदिष्ट.
**छाया**–( सं. ); कांति, टवटवी, सावली.
**छुरिका**–( सं. ); सुरी.

## ज

**जलयंत्र**–( सं. ); कारंजें.
**जव**–( सं. यव ); हातांतील बांगड्यासारखा दागिना.
**जवन**–( सं. ); वेगवान.
**जाकळणें**–पोळणें, कळवळणें.
**जिव्हार**–( सं. जीव ); अंतःकरण, काळीज.
**जिव्हाळा**–(सं. जीव); झरा, अंतःकरण.
**जेठी**–( सं. ज्येष्ठ ); मल्ल, पैलवान.
**जोहरी**–( फा. ); रत्न पारखी.
**जंगम**–( सं. ); चल; एका ठिकाणाहून दुसरीकडे हलवितां येणारा.
**जांब**–( फा. जाम् ); पेला.
**जांबूनद**–( सं. ); सोनें.

## झ

**झळाळी**–( सं. झला ); तेज, चकाकी.
**झांपडी**–( सं. स्वाप ); झांपड, गुंगी.
**झांस** ( हिं. झासा ); धमकावणी, तळमळ.
**डाळणें**–( सं. दल् ); डावलणें; प्रतिकार करणें, बाजूला लोटणें.
**डांभा**–( सं. दंभ ); डौल, गर्व.

## ढ

**ढाल**–ढंग, साहस कर्म.

## त

**तकवा**–( फा. ). धीर, बळ.
**तगटी**–( फा. तख्त ); भरजरी.
**तटणें**–( सं. तट ); थांबणें, बंद पडणें.
**तनुता**–( सं. ); क्षीणता.
**तन्वी**–( सं. ); नाजूक, सडपातळ अंगाची स्त्री.
**तमिस्र**–( सं. ). अंधःकार.
**तरल**–( सं. ); अस्थिर, चकाकणारे.
**तरला**–( सं. ); चपल स्त्री.
**तल्प**–( सं. ); बिछाना.
**ताटक**–( सं. ); तानवडा, एक कर्णभूषण.
**तानवडा**;–एक कर्णभूषण.
**ताफता**–(फा. ताफ्ता), एक उंची रेशमी वस्त्र.
**तालवृंत**–( सं. ); पंखा.
**तिरकुट**–( सं. तिल ); तीळकूट, तीळ कुटून केलेली चटणी.
**तिवाटी**–( सं. त्रि+वाट ); विधुळवाटी.
**तिवाशी**–( फा. ); गादी, गालिचा.
**तिळवा**–( सं. तिल. ); तिळाचा लाडू.
**तुहिनकर**–( सं. ); चंद्र.
**तोडर**–( का. ); पायांत घालण्याचा एक दागिना.
**तंती**–( सं. ); ओळ, मार्ग.
**तांखडी**–हुशार, शहाणी.
**तांत्रिक**–( सं. ); तंत्रशास्त्रज्ञ.
**तोंडखोडी**;–तोंड टाकून बोलण्याची खोड असणारा.
**त्रपा**–( सं. ); लज्जा.

थ

**थटी**–(सं. स्था.); कणगी, सांठव-विण्याची जागा.

**थोकणें**–(सं. स्था.); थांबणें.

द

**दमन**–(सं.); पराभव.

**दमामा**–(फा.); मोठा नगारा.

**दरोगीण**–(फा.); दासींवर देखरेख करणारी मुख्य दासी.

**दळद्र**–(सं. दल.); दळदार, जाड.

**दारिका**–(सं.); कन्या.

**दावें**–(सं. दाम.); दोरी.

**दाशार्ह**–(सं.) यादव.

**दिनमणी**–(सं.) सूर्य.

**दिदृक्षा**–(सं.); पाहण्याची इच्छा.

**दीक्षा**–(सं.); नेहमींची रीत.

**दुकूल**–(सं.); वस्त्र.

**दुरळ**;–कडक, तीव्र.

**दुराशा**–(सं.); दुष्ट वासना.

**दुरित**–(सं.); पाप.

**दुलडी**–(दु+लड=सर); दूड.

**दूरदृष्ट**–(सं.); अदृष्ट, दैव.

**देखी**–(सं. दृश्); दृष्ट.

**देवई**–(सं. देवकी; प्रा. देवई, कृष्ण-माता देवकी.

**देवडें-ढें**–(देहुडा); (सं. देह) वांकडा, वक्र.

**देहली**–(सं.); उंबरठा.

**दैनंदिन**–(सं.); रोजचें.

**दैवज्ञ**–(सं.); जोशी, ज्योतिषी.

**दैवेकरी**;–दैववान्.

**दोहणें**–(सं. दुह्); दूध काढणें.

**दौवारिक**–(सं.); द्वारपाल, रक्षक.

**दौश्चित्य**–(सं.); दुष्ट विचार.

**द्वारवती**–(सं.); द्वारावती, द्वारका नगरी.

**द्विजपति**–(सं.); चंद्र, ब्राह्मणश्रेष्ठ.

**द्विजराज**–(सं.); चंद्र.

**द्वैपायन**–(सं.); शुक.

ध.

**धटी**–(सं.); मूल्यवान् रेशमी वस्त्र.

**धन्वी**–(सं.); धनुर्विद्येंत प्रवीण असलेला; धनुर्धारी.

**धम्मिल्ल**–(सं.); केशकलाप, वेणी.

**धसणें**;–घुसणें

**धाणें**–(सं. धा;) तृप्त होणें.

**धाता**–(सं.); ब्रह्मदेव.

**धात्री**–(सं.); दाई.

**धाम**–(सं.); तेज, वसतिस्थान.

**ध्वांत**–(सं.); अंधःकार.

न.

**नर्द**–(फा.); नरद, सोंगटी.

**नवोढा**–(सं.); नववधू.

**नाति**–(सं. नप्त्री); नात.

**नाराच**–(सं.); बाण.

**नारिकेल**–(सं.); नारळ.

**नालीक**–(सं.); बाण, बंदूक.

**निकसी**–(सं. निकष); मऊ, गचाळ.

**निकेत**–( सं. ); स्थान

**निकेतन**–( सं. ); स्थान, घर.

**नितंबिनी**–( सं. ) स्त्री.

**नितंबणें**;–चकाकणें, शोभणें, सुंदर दिसणें.

**निदेश**–( सं. ); आज्ञा, निरोप.

**निधायी**–( सं. नि+धा ); विश्वासांतील स्त्री किंवा दासी.

**निधि**–( सं. ); समुद्र, खजिना, द्रव्याचा सांठा.

**निपट**;–खरोखर, सर्वस्वी.

**नियत**–( सं. ); खरोखर.

**नियोजणें**–( सं. नियुज् ); जुंपणें, लावणें.

**निरत**–( सं. ); तत्पर.

**निरय**–( सं. ); नरक.

**निराळ**–( सं. निरालय ); आकाश.

**निरीह**–( सं. निर्+ईहा ); निरिच्छ.

**निरंजन**–( सं. ); निर्विकल्प, शुद्ध.

**निर्द्वंद्व**–( सं. ); सुखदुःखरहित.

**निर्वाण**–( सं. ); सुटका.

**निर्वाह**–( सं. ); कार्यक्षमता, अंगीकृत कार्य पार पाडण्याचा निश्चय.

**निर्विकल्प**–( सं. ); अज्ञेय, अतर्क्य.

**निलज**–( सं. ); निर्लज्ज.

**निवह**–( सं. ); समुदाय.

**निवाडें**–( सं. निर्वृत् ); शेवटीं, अखेरीस.

**निवाणी**–( सं. निर्+वर्ण ); खराब, वाईट.

**निवेदणें**–( सं. निविद् ); समर्पण करणें.

**निवृत्ति**–( सं. ); वैराग्य.

**निश्चेतना**–( सं. ); मूर्छा.

**निषद्या**–( सं. ); जागा, स्थान.

**निःसंग**–( सं. ) तटस्थ, उदासवृत्तीचा.

**निराजणें**–( सं. निराज् ); निरांजन ओवाळणें.

**नीवि**–( सं. ); निऱ्या, निऱ्यांची गांठ.

**नीशार**–( फा. ); मच्छरदाणी, धाबळी.

**नैय्यायिक**–(सं.); न्यायशास्त्र जाणणारा.

**नैर्ऋत्य**–( सं. ); नैर्ऋत्येकडची देवता, नैर्ऋत्येय.

**न्याहाली** ( फा. न्यहाल ); पराची गादी.

## प

**पटह**–( सं. ); नगारा, ढोल.

**पडण**–( सं. पतन ); संकट.

**पण्यांगना**–( सं. ); वारांगना.

**पतद्ग्रही**–( सं. ); तस्त.

**पद्मराग**–( सं. ); माणिक, लाल.

**परभाग**–( सं. ); उत्तम गुण.

**परमहंस**–( सं. ); संन्यासी.

**परावृत्ति**–( सं. ); परत फिरणें.

**परिणत**–( सं.); ज्ञानवृद्ध.

**परिपाक**–( सं. ); परिणाम, फळ.

**परिपाटी** ( सं. ); रीत, परिपाठ.

**परिवेषण**–( सं. ); वाढप.

**पल्लव**–( सं. ); पदर

**पल्ली**–( सं. ); पाल.

**पवणें**–( सं. प्राप् ); पावणें, मिळणें.

**पाखर**–(सं. प्रक्खर, प्रक्षर; प्रा. पख्खर.) घोड्याची किंवा हत्तीची झूल.

**पाची**–एक रत्न.

**पाटाउ** ( सं. पट्ट ); उंची रेशमी वस्त्र. पाटाव.

**पाड**–महत्त्व, मोठेपणा.

**पातित्य**–( सं. ); अधःपात.

**पातें**–( सं. पत्र ); पापणी.

**पाद्य**–( सं. ); देवास स्नानाचे वेळीं घालण्याचें पाणी.

**पान**–( सं. पर्ण ); कर्णभूषणविशेष.

**पामर**–( सं. ); गरीब.

**पारणें**–( सं. पारणं ); समाधान, तृप्ति.

**पालव**–( सं. पल्लव ); पदर.

**पाव**–( सं. पाद ); पाय.

**पावक**–( सं. ); अग्नि.

**पाशपाणी**–( सं. ); वरुण.

**पाळा**–( सं. पालि. ); वेढा, समुदाय.

**पिसाळणें**–( सं. पिशाच ); वेड्यासारखें वागणें.

**पीठ**–( सं. ); आसन.

**पुरारि**–( सं. ); शंकर.

**पुरोडाश**–( सं. ); हविर्द्रव्य.

**पुलीन**–( सं. ); वाळवंट.

**पुष्पेषु**–( सं. ); मदन.

**पूगीफल**–( सं. ); सुपारी.

**पूर्त**–( सं. ); दानधर्माचें कृत्य.

**पेषण**–( सं. ); दळणें.

**पैशुन्य**–( सं. ); लबाडी, चहाडखोरपणा.

**पोख्ती**–( फा. पोख्त. ); पोक्त, प्रौढ.

**पोल्हार**;–बायकांचा पायाच्या आंगठ्यांत घालण्याचा चांदीचा दागिना.

**पंजर**–( सं. ); पिंजरा.

**पंवाडा**–( सं. प्रवाद ); पराक्रम.

**पांजण**–( सं. पा. ); नव्या वस्त्रास खळ देणें.

**पांड्य**–एका देशाचें नांव.

**पोंहची**–( हिं. ); पोंची; पुरुषाच्या मनगटावरील एक दागिना.

**पौंड्रक**–( सं. ); चिन्ह.

**प्रोच्छन**–( सं. स्पृश् ); अंग पुसणें.

**प्रणति**–( सं. ); नमस्कार, नमन.

**प्रतीहारिका**–( सं. ); द्वारपालिका.

**प्रथित**–( सं. ); विख्यात.

**प्रमाणगी**–( सं. प्रमाण ); परवानगी, हुकूम.

**प्रवाह**–( सं. ); कार्यक्रम.

**प्रवाळ**–( सं. ); पोंवळें.

**प्रस्ताव**–( सं. पश्चात्ताप; म. पस्ताव ); पश्चात्ताप.

**प्रक्षेप**–( सं. ); टाकणें, ऐकणें.

**प्राकार**–( सं. ); तट.

**प्राशन**–( सं. ); भक्षण.

### फ

**फरा**–घेर, आवार.

**फरास**–( फा. ); बिछाईत घालणारा.

**फांकणें**–( सं. स्फाय् ); लांब जाणें.

**फुलेल**–( फूल + तेल ); फुलांचें अत्तर, तेल.

## ब

**बजागी**–( हिं. ); हट्टी, भांडखोर.

**बडिश**–( सं. ); बलिश; मासे धरणाऱ्या कोळ्याच्या दोरीला मासा अडकण्याकरितां बांधलेला गळ.

**बधणें**–( सं. बंध् ); घडून येणें, जमणें, वश होणें.

**बराडी**;–भिकारी, आशाळभूत.

**बर्ह**–( सं. ) पीस.

**बलाई**–( फा. ); इडापिडा, संकट.

**बहळ**–( सं. बहल ); पुष्कळ.

**बाट**–( सं. भ्रष्ट ); लबाड.

**बाड**–( फा. ); तंबूची कनात, पडदा.

**बाफता**–( फा. ); रेशमी वस्त्र.

**बाहुणें**–( सं. ह्वे ); बोलावणें.

**बाहे**–( सं. बाहु ); हात.

**बिजवरा**–( सं. द्वितीया. म. बीज. ) एक कपाळावरचा दागिना.

**बिडाल**–( सं. ); मांजर.

**बिदी**; ( सं. वीथि ); रस्ता, गल्ली.

**बिरडें**–गांठ.

**बीरुद**–( सं. बिरुद ); प्रतिज्ञा, बाणा, ब्रीद.

**बुझवणें**–( सं. बुध् ); समजूत करणें.

**बेसर**–( हिं. ); नथ, चमकी.

**बोज**–प्रतिष्ठा, महत्त्व.

**बोटवा**–गव्हला.

**बंदी**–( सं. ); भाट, स्तुतिपाठक.

## भ.

**भाक**–( सं. भाष् ); वचन.

**भान**–( सं. ); ज्ञान, कल्पना.

**भारती**–( सं. ); वाणी.

**भावणें**–( सं. भाव ); वाटणें

**भुजिष्या**–( सं. ); दासी.

**भूत**–( सं. ); प्राणी.

**भूमीरुह**–( सं. ); वृक्ष.

**भेकी**–( सं. ); बेडकी.

**भेरी**–( सं. ); नौबत.

**भेषज**–( सं. ); औषध.

## म

**मणिबंध**–( सं. ); मनगट.

**मधुपर्क**–( सं. ); अतिथीची पूजा.

**मध्य**–( सं. ); कंबर.

**मनस्वी**–( सं. ); मन ताब्यांत असलेला, शहाणा.

**मरीच**–( सं. ); काळें मिरें.

**मल्ली**–( सं. ); पांढरी जाईची वेल.

**महर्घ**–( सं. ); महाग, दुष्प्राप्य.

**महाप्रस्थान**–( सं. ); मृत्यु.

**महिषी**–( सं. ); म्हैस.

**मागती**;–पुन्हां.

**माज**–( सं. मध्य ); कंबर.

**मातुलिंग**–( सं. ); महाळुंग.

**मालती**;–गव्हल्यासारखा खिरींत घालण्याचा एक पदार्थ.

**माव**–( सं. माया ); कपट, माया.

**माष**–( सं. ); उडीद.

**मिहिर**–( सं. ); सूर्य.

**मीमांसक**–( सं. ); मीमांसा जाणणारा.

**मुकुलित**–( सं. ); मिटलेलें.

**मुखरणि**–( सं. मुखर ); मुखरण; मुख्य.

**मुग्ध**–( सं. ); वेडा.

**मुग्धा**–( सं. ); सोळा वर्षाच्या आंतील स्त्री.

**मुदा**–( फा. ); मुद्दा, मुख्य गोष्ट.

**मुद्रिका**–( सं. ); अंगठी.

**मुरणें**–( फा. मुरब्बा ); तृप्त होणें.

**मुष्टिक**–( सं. ); मुष्टियुद्ध करणारा.

**मुसली**–( सं. ); बलराम.

**मुळचिठ्ठी**–( सं. मूळ + चिट्ट), आमंत्रण-पत्रिका.

**मूर्धन्य**–( सं. ); श्रेष्ठ, मुकुटमणि.

**मूस**–( सं. मूष ); आटणी, साचा, घडण.

**मूळ**–( सं; मूल ); बोलावणें.

**मेखळा**–( सं. मेखला ); कमरपट्टा.

**मेचक**–( सं. ); मेघ.

**मेचणें**;–भिऊन माघार घेणें.

**मेटें**;–चौकी, पहारा.

**मेध्या**–( सं. ); हुशार, शहाणी.

**मोकलणें**–( सं. मुक्त. प्रा. मोक. ); पाठविणें, सोडणें.

**मोट**;–सांठा.

**मोर**–( सं. मयूर ); नाकांतील एक दागिना, मोरणी.

**मोरछळ**–( हिं. ); मोरचल, मोराच्या पिसांचा कुंचा किंवा चवरी.

**मोळा**;–वागण्याची पद्धत.

**मंत्रवादी**–( सं. ); मांत्रिक, मंत्र घाल-णारा.

**मंथणें**–( सं. मंथ् ); पराभव करणें, ठार मारणें.

**मैंद**;–घातकी, दुष्ट माणूस.

## य

**यज्वा**–( सं. ); होमहवन करणारा.

**यान**–( सं. ); रथ.

**यायजूक**–( सं. ); नेहमीं यज्ञ करणारा.

**यावा**–डौल.

**येला**–( सं. एला ); वेलची, वेलदोडा.

**येव**;–येणें.

**योग**–( सं. ); भेट, प्रसंग, ध्यान.

**योगनिद्रा**–( सं. ); समाधि.

**यंत्र**–( सं. ); कांहीं तरी जादुटोण्याची आकृति किंवा कोष्टक.

## र

**रती**–( सं. रक्तिका = गुंज ); हिरे–मोत्यें वजन करण्याचें अति लहान वजन.

**रय**–( सं. ); वेग, गति.

**रव**–( सं. ); आवाज, स्वर.

**रशना**–( सं. ); कंबरपट्टा.

**रसाला**–( सं. ); सुरस, रसाळ.

**रसोडेक**–( सं. रस ); रसाळ, रसभरित.

**रहाणें**–( फा. ); रहाणी, वागण्याची पद्धत.

**रहाळ**–( फा. ); परिचय, मार्ग.
**राका**–( सं. ); पौर्णिमा.
**राजक**–( सं. ); राजांचा समुदाय.
**राजन्य**–( सं. ); राजांचा समुदाय.
**रातणें**–( सं. रम् ) रममाण होणें.
**राव**–( सं. राजन् ); राजा.
**रुक्म**–( सं. ); सोनें.
**रुचि**–( सं. ); रंग.
**रुचिर**–( सं. ); सुंदर.
**रोख**–( फा. ); झोंक, मनाचा कल.
**रोखणें**–( फा. ); बंद पाडणें, बंद पडणें.
**रोचकता**–( सं. ); रुचि.
**व्ही**–( सं. ); लज्जा.

## ल

**लसणें**–( सं. लशुन ); वैदूर्यमणि, एक रत्न.
**लागट**–(सं. लग् ); लोचट, चिकटणारी.
**लालस**–( सं. ); उत्कंठेनें, उत्कंठित.
**लासणें**–( सं. लांछ् ); भाजणें.
**लांसी**–; राक्षसीण.
**लाहणें**–( सं. लभ् ); मिळणें.
**लिगाड**–खोडसाळ.
**लिप्त**– ( सं. ); दूषित.
**लेखा**–( सं. लेख ); किमत, पाड.
**लेणें**–( सं. लेपन ); दागिना, धारण करणें.
**लेवा**–( सं. लेप ); लेप.
**लौंद**;–दांडगे.

## व

**वचणें**–( सं. व्रज् ); जाणें.
**वदान्य**–( सं. ); उदार.
**वयस्या**–( सं. ); सखि, मैत्रीण.
**वरपंगती**–( वरपंख ), वरकांनी, वरवरचा देखावा.
**वराकी**–( सं. ); गरीब, दुर्दैवी स्त्री.
**वराडी**– ( सं. वर+हाट ); वऱ्हाडी, लग्नकार्याकरितां जमलेले लोक.
**वरान्न**–( सं. वर+अन्न ); वरण.
**वरोरू**–( सं. ); सुंदर स्त्री.
**वर्ग्य**–( सं. ); बांधव, भाऊबंद.
**वल्लरी**–( सं. ); वेली.
**वळवट**–( सं. वलय, म. वळणें ); गव्हले, शेवया वगैरे वळून केलेले पदार्थ.
**वक्षोरुह**–( सं. ); स्तन.
**वाक्पति**–( सं. ); बृहस्पती.
**वाखा**–( फा. ); नाश, त्रास, पडापडी.
**वाजपेयी**–( सं. ); वाजपेय नांवाचा यज्ञ करणारा.
**वातायन**–( सं. ); खिडकी.
**वादित्र**–( सं ); वाजंत्री.
**वारुणी**–( सं. ); पश्चिम दिशा.
**वावडणें**–भटकणें.
**वावहणें**–पळून जाणें.
**वाळक**–( सं. वालुकी ); वालुक, काकडी.
**विकणें**–( सं. विक्री ); मान्य होणें.
**विकत्थन**–( सं. ); गर्व, प्रौढी.
**विखळ**–( सं. वि+खल ); दुष्ट.

**विखंडणें**–( सं. वि+खंड् ); दुःखित करणें.
**विघड**–( सं. विघट् ); बिघाड, वियोग.
**विच्छाय**–( सं. ); फिकें, पांढरें.
**विजवटी**–( सं. विद्युत्+वत् ); द्वाड, व्रात्य.
**विटंक**–( सं. ); खुराडें.
**विदग्ध**–( सं. ); शाहाणा माणूस.
**विधेयी**–( सं. ) कर्तव्यदक्ष.
**विपारी**–( सं. विपरीत ); विरूप, कुरूप.
**विपंची**–( सं. ); वीणा.
**विप्रतिपत्ती**–( सं. ); मतभिन्नता.
**विप्रश्निक**–( सं. ); भविष्य सांगणारा ज्योतिषी.
**विबुध**–( सं. ); देव.
**विभूति**–( सं. ); रक्षा, राख.
**विरोदी**–विरोली, पायाच्या बोटांतील चांदीचा दागिना.
**विलसणें**–( सं. विलस् ); शोभणें.
**विलसित**–( सं. ); शोभा, सौंदर्य.
**विलुठणें**–( सं. विलुट् ); लोळणें.
**विशाखा**–( सं. ); एक नक्षत्र.
**विशिख**–( सं. ); बाण.
**विसंबणें**–( सं. विश्रम् ); त्याग करणें, सोडणें.
**विहित**–( सं. ); नेमून दिलेलें.
**विहिरा**–विहीर.
**विज्ञ**–( सं. ); ज्ञानी पुरुष.
**वीचि**–( सं. ); लाट, लहर.
**वीथि**–( सं. ); मार्ग.
**वेंघविणें**–( कों. वेंग ); चढविणें.
**वेठे**–( सं. विष्टि ); बिगारी, मजूर.
**वेत्रधर**–( सं. ); भालदार, चोपदार.
**वेदिका**–( सं. ); ओटा.
**वेदी**–( सं. ); यज्ञाचा ओटा.
**वेधा**–( सं. ); ब्रह्मदेव.
**वैखरी**–( सं. ); वाणी
**वैदग्ध्य**–( सं. ); चातुर्य.
**वो**–( सं. अहो ); अवो, अहो.
**वोचकणें**–( सं. भय+चक; हिं. भयक्. म. वचक ) भिणें, वचकणें.
**वोटी**–( का. उडी. ); ओंटी.
**वोड**–( सं. ऊढ ); आपत्ति.
**वोढी**–( सं. ऊढ ); ओढ.
**वोसजणें**;–ओसरणें, कमी होणें.
**वोळघणें**–( सं. उल्लंघ् ); चढणें, वळणें.
**वोहट**–( सं. अवघट्ट, प्रा. ओहट्ट ); ओहटी.
**विंजण**–( सं. व्यजन ); वारा.
**विंजणा**–( सं. व्यजन ); पंखा.
**वृष्णि**–( सं. ); यादव.
**व्यक्त**–( सं. ); परमात्म्याचे सगुण साकाररूप.
**व्यजन**–( सं. ); पंखा.
**व्यवसित**–( सं. ); व्यवसाय.
**व्रज**–( सं. ); गोकुळ.

## श

**शकट**–( सं. ); गाडा, गाडी.

**शची**–( सं. ), इंद्राणी.
**शरीरी**–( सं. ); शरीर धारण करणारा पुरुष.
**शर्वाणी**–( सं. ); पार्वती.
**शलाका**–( सं. ); सळई.
**शशी**–( सं. ); चंद्र, कापूर.
**शाठिका**–( सं. ); साडी, पैठणी.
**शाली**–( सं. ); साळी, भात.
**शिबीर**–( सं. ); सैन्याचा तळ.
**शिक्षापन**–( सं. ); शिकवण.
**शूर्प**–( सं. ); सूप.
**शेखर**–( सं. ); डोक्यावरचा तुरा.
**शैवल**–( सं. ); शेवाळ.
**शोण**–( सं. ); तांबडें.
**शौरी**–( सं. ); कृष्ण.
**शांभव**–( सं. ); शंकरभक्त.
**शृंगाटक** ( सं. ); रस्त्यांतला चौक.
**श्यामल** ( सं. ); सांवळें.
**श्रोत्रिय** ( सं. ); वैदिक ब्राह्मण.
**श्लथ** ( सं. ); सैल.

## स

**सक्त** ( सं. ); गुंतलेला, आसक्त.
**सखवार** ( सं. सुकुमार ); सुकुमार.
**सखर** ( सं. स+खर ); ठाशीव, घट्ट विणीचें.
**सजण** ( सं. स्वजन ); मित्र, सखा.
**सजणें** ( सं. सज्ज ); जमणें, घडणें, शोभणें.
**सतखा** ( फा. ); ओवाळून टाकलेला जिन्नस.
**सतरंज** ( फा. ); बुद्धिबळें.
**सनातन**–( सं. ); चिरकाल टिकणारें, शाश्वत.
**सप्তाश्व**–( सं. ); सूर्य.
**समीक्षा**–( सं. ); शोधपूर्वक पहाणें.
**सरवळा**;– गव्हल्यासारखा खिरींत घालण्याचा एक पदार्थ.
**सवारणें**–( सं. संवृ ); शृंगारणें.
**सहकार**–( सं. ); आम्रवृक्ष.
**सहकारी**–( सं. ); पत्नी.
**साची**–( सं. सत्य ); सुंदर.
**साजिरा**–( सं. सज्ज ); सुंदर.
**सात्यकि**–( सं. ); कृष्णाचा सारथी.
**साध्वस**–( सं. ); भीति.
**सारंग**–( सं. ); हरिण.
**सायी**–( सं. छाया ); सावली.
**साली**–( सं. श्याली ); मेहुणी.
**साव**–( सं. साधु. प्रा. साहु ); प्रामाणिक पुरुष.
**सित**–( सं. ); टोंक असलेला, कुशाग्र.
**सिसफूल**–( सं. शीर्षपुष्प ); केसांत घालण्याचें चंद्राकार फूल.
**सुरवा**–( फा. ); विजार, पायचोळणा.
**सुजि**–सूज, वाढ.
**सूद**–( सं. ); स्वैपाकी.
**सेला**–( सं. चैल ); शेला.
**सोमयाजी**–( सं. ); सोमयाग करणारा.

**सौमिक**–( सं. ); सोमरसासंबंधीं.
**सौर**–( सं. ); सूर्योपासक.
**सौविदल्ल**–( सं. ); जनानखान्यांतील सेवक.
**संकर्षण**–( सं. ); बळराम.
**संच**–( सं. संचय ), बांधा, पुडा.
**संध्या**–( सं. ); संधिकाल.
**संभार**–( सं. ); साहित्य, समूह.
**संभ्रम**–( सं. ); घोंटाळा.
**संमार्जनी**–( सं. ); केरसुणी.
**संवाहन**–( सं. ); पाय चेपणें, चुरणें.
**संविधान**–( सं. ); व्यवस्था, तयारी.
**संविजन**–( सं. व्यजन ); वारा घालणें.
**संसृति**–( सं. ); संसार.
**संक्षुब्ध**–( सं. ); प्रक्षुब्ध, रागावलेला.
**सांकड**–( सं. संकट ); संकट.
**सांडणी**–ओवाळून टाकलेला पदार्थ.
**सांव**–( सं. स्नायु. ); नाडी, शीर.
**सिंपी**–( सं. शुक्ति. प्रा. सिप्पी ); बोंडलें, दूध पाजण्याचा शिंपला.
**सौंगडी**–( सवेंगडी ); संवगडी, सोबती.
**स्पंदन**–( सं. ); चलन-वलन, हालचाल.
**स्यंदन**–( सं. ); रथ.
**स्थगित**–( सं. ); विचारांत गढून गेलेली तल्लीन; लुप्त.
**स्मेर**–( सं. ); हास्य.
**स्वन**–( सं. ); नाद, आवाज.
**स्वाप**–( सं. ); निद्रा.
**हरिता**–( सं. हरित् ); दिशा.
**हरिद्रा**–( सं. ); हळद.
**हलधर**–( सं. हल-नांगर ); बळराम.
**हळी**–( सं. ); हली, बळराम.
**हाट**–( सं. हट्ट ); बाजार.
**हातसर**;–हातांत घालण्याचे मणगट्यां-सारखे सर.
**हातरोखा**;–हातानें लिहून ठेवलेली हुंडी, दस्त ऐवज वगैरे.
**हिलाली**–( फा. ); मशाल धरणारा.
**हीरक**–( सं. ); हिरा.
**हुतवह**–( सं. ); अग्नि.
**हुताशन**–( सं. ); अग्नि.
**हुंबरी**;–गवळ्याचा एक खेळ.
**हेजीब**–( फा. ); दूत.
**हेला**–( सं. ); हेळसांड, धिक्कार.
**होरड**–हट्ट.
**हंसतुळिका**–( सं. ); हंसाच्या पराची गादी.
**ह्रद**–( सं. ); सरोवर.